२

20140828160242722З

सेवाग्राम आश्रम प्रतिष्ठानाला सहायक
अनुदान मंजुरकरण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
क्र. टीडीपी २००९/ २ / प्र.क्र. ५१ /पर्यटन
पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
दिनांक : २४ फेब्रुवारी, २००९.

वाचा :- १) शासन निर्णय, समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रिडा व पर्यटन विभाग क्रमांक डीटीटी १०८२ / ५८८८/सीआर- ५३८/ पर्यटन, दिनांक २१.३.१९८५.

**शासन निर्णय**

सेवाग्राम आश्रम प्रतिष्ठान, जिल्हा वर्धा यांना देखभालीसाठी रु.१५,०००/- (रुपये पंधरा हजार फक्त ) सन २००८-०९ या वर्षासाठी सहायक अनुदान अदा करण्यासाठी शासन या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देत आहे.

२. सदरची रक्कम सेवाग्राम आश्रम प्रतिष्ठानला अदा करण्यासाठी श्री.आ.बा.डमाळे, कार्यासन अधिकारी, पर्यटन व सांसकृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई -३२ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून व श्री. किरण कुरुंदकर, सहसचिव, पर्यटन व सांसकृतिक कार्य विभाग यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले आहे.वरील निर्णयानुसार मंजूर करण्यात आलेल्या सहाय्यक अनुदानाची रक्कम अधिदान व लेखाधिकारी, मुंबई येथुन सचिव, सेवाग्राम आश्रम प्रतिष्ठान, जिल्हा वर्धा **(The Secretary,Sewagra, Ashram Pratishthan, Sevagram, District Wardha)** या नावे धनादेश काढून संबंधितांना वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

३. या सहाय्यकअनुदानावरील खर्च मागणी क्रमांक झेडडी -४, लेखाशिर्ष ३४५२-पर्यटन ०१-पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१ पर्यटन केंद्रे, ०१-पर्यटन केंद्रे (योजनेतर)(०१) (०४) सेवाग्राम आश्रम प्रतिष्ठानाला सहाय्यक अनुदान (३४५२ १८६ १) ३१, सहाय्यक अनुदाने, योजनेतर या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा, व तो सन २००८-०९ वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.सदर निधी मासिक निधी विवरणपत्राप्रमाणे फेब्रुवारी, २००९ मध्ये वितरीत करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे.

४. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, नियम १९७८ भाग पहिला उप विभगा एक शासन निर्णय क्रमांक विअप्र १००० / प्र.क्र.४६/२००१, दिनांक ११ जुलै,२००१ मधील अनुक्रमांक२७,

नियम क्रमांक १४९ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

आ।ब।डमाळे
( आ. बा. डमाळे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

महालेखापाल, महाराष्ट्र -१(लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) , मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र -२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
मुख्य अधिकारी,सेवाग्रामआश्रम प्रतिष्ठान जिल्हा वर्धा
वित्त विभाग (व्यय-१४) मंत्रालय, मुंबई
पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग ( अर्थसंकल्प शाखा) मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती , कार्यासन पर्यटन